उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद व कार्यालयीन अधिक्षक, जलस्वराज्य या पदांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या निश्चित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र. ७७/पापु-०७**
७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१
तारीख: ०२ मार्च, २०१५.

**वाचा :-**

१) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४(अ)/पापु-०७, दिनांक १७ मार्च, २०१०.
२) **शासन परिपत्रक क्रमांकः** स्वभामि-२०१४/प्र.क्र.२७/पापु-०८, दिनांक ०७ नोव्हेंबर, २०१४.
३) **शासन निर्णय क्रमांकः** जस्वप्र-१२१३/प्र.क्र.२००/पापु-११, दिनांक ०४ जानेवारी, २०१४.

**प्रस्तावना :-**

पाणी पुरवठा व स्वच्छता विभागामार्फत पाणी पुरवठा क्षेत्राच्या सबलीकरणासाठी केंद्र शासन पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम तर स्वच्छता क्षेत्राच्या यशस्वीतेसाठी केंद्र शासन पुरस्कृत स्वच्छ भारत अभियान राबविण्यात येत आहे. जागतिक बँक अर्थसहाय्यीत जलस्वराज्य टप्पा-२ कार्यक्रमाची अंमलबजावणी देखील विभागामार्फत सुरु करण्यात आलेली आहे. पाणी पुरवठा विभागाच्या या तिन्ही महत्वाच्या कार्यक्रमांची अंमलबजावणी जिल्हा परिषदेमार्फत केली जाते. यासाठी जिल्हा परिषदेअंतर्गत उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रामपंचायत) तसेच कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद हे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या नियंत्रणाखाली कार्यरत आहेत. राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम, स्वच्छ भारत मिशन व जलस्वराज्य-२ अभियान या कार्यक्रमांचा विचार करून उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता) हे पद नव्याने निर्माण करण्यात आलेले आहे. या पदाचे पहिल्या सहा वर्षांकरीताचे वेतन जलस्वराज्य टप्पा-२ अभियानांतर्गत प्राप्त होणाऱ्या निधीमधून अदा केले जाणार आहे. हे पद निर्माण करतांना उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रामपंचायत) यांच्याकडील पाणी पुरवठा व स्वच्छता क्षेत्राचा भार कमी करण्याचा उद्देश आहे.

उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता) व कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद यांच्या कामकाजात पाणी पुरवठा व स्वच्छता बाबींकरीता सुसूत्रता आणणे गरजेचे

झाले आहे. भविष्यात या दोन्ही पदांमध्ये आपआपसात गैरसमज वा वाद होणे टाळण्यासाठी व त्यांच्या वादाचा अनिष्ट परिणाम ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता कार्यक्रमाच्या प्रगतीवर होण्याचे टाळण्यासाठी या दोन्ही पदांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या सुधारित करणे आवश्यक झाले आहे. या व्यतिरिक्त राज्यभरात जलस्वराज्य टप्पा-२ या कार्यक्रमाची अंमलबजावणी सुरु झाली आहे. सदर कार्यक्रम महाराष्ट्र राज्यात पथदर्शी कार्यक्रम म्हणून राबविण्यात येत आहे. या कार्यक्रमाचा कालावधी केंद्र शासनामार्फत सहा वर्षांकरीता निश्चित करण्यात आलेला असल्याने या कार्यक्रमाचे जिल्हा स्तरावरील कामकाज हाताळण्यासाठी उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता) यांच्या नियंत्रणाखाली जलस्वराज्य कक्षाकरीता कार्यालयीन अधीक्षक हे पद देखील निर्माण करण्यात आले आहे.

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम, स्वच्छ भारत अभियान व जलस्वराज्य टप्पा-२ या कार्यक्रमांच्या अधिक प्रभावी अंमलबजावणीसाठी व यशस्वीतेसाठी (१) उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता), जिल्हा परिषद, (२) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पुरवठा विभाग, जिल्हा परिषद आणि (३) जिल्हा कार्यालयीन अधीक्षक, जलस्वराज्य टप्पा-२, या तिन्ही पदांची कर्तव्ये, भुमिका व जबाबदाऱ्या स्वतंत्र करुन त्यामध्ये एकसुत्रता आणण्यासाठी या तिन्ही पदांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेऊन स्वच्छ भारत मिशन, राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम व जलस्वराज्य टप्पा-२ या कार्यक्रमांच्या अंमलबजावणीसाठी (१) उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता), जिल्हा परिषद, (२) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पुरवठा विभाग, जिल्हा परिषद आणि (३) कार्यालयीन अधीक्षक, जलस्वराज्य टप्पा-२, या तिन्ही पदांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या खालील प्रमाणे निश्चित करण्यात येत आहेत:-

**उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता), जिल्हा परिषद हे पद प्रशासकीय स्वरुपाचे पद असल्याने त्यांच्यावर सर्व प्रशासकीय व आर्थिक बाबींची जबाबदारी सोपविण्यात येत आहे.**

**कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद हे पद तांत्रिक स्वरुपाचे असल्याने त्यांच्यावर सर्व तांत्रिक स्वरुपाची जबाबदारी सोपविण्यात येत आहे.**

उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता), जिल्हा परिषद, कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद व कार्यालयीन अधिक्षक, जलस्वराज्य टप्पा-२ यांची कार्यक्रमनिहाय सर्वसाधारण कर्तव्ये व जबाबदाऱ्या पुढीलप्रमाणे राहतील.

# (१) स्वच्छ भारत मिशन

### (१) (अ) उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता), जिल्हा परिषद यांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या

१. स्वच्छ भारत मिशन व संत गाडगेबाबा अभियान या कार्यक्रमाची अंमलबजावणी करणे.

२. स्वच्छ भारत मिशनमध्ये प्रकल्प अंमलबजावणी आराखडा व वार्षिक अंमलबजावणी आराखडा तयार करणे.

३. जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्ष, गट संसाधन केंद्र, जलस्वराज्य टप्पा-२ यामधील सर्व कर्मचाऱ्यांच्या कामाचे संनियंत्रण, उद्दिष्टपूर्ती, कर्मचाऱ्यांचे मानधन, रजा, पुनर्नियुक्ती, भरती इतर प्रशासकीय बाबींचे संनियंत्रण करणे.

४. स्वच्छ भारत मिशनमध्ये माहिती, शिक्षण, संवाद आराखडा व क्षमताबांधणी आराखडा, समुदाय संचलित हागणदारी मुक्त गाव कृती आराखडा तयार करणे.

५. पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण कार्यक्रमाच्या अंमलबजावणीमध्ये स्वच्छता सर्वेक्षण, पाण्याचे जैविक व रासायनिक तपासण्या केलेल्या सर्वेक्षणाचे ऑनलाईन रिपोर्टिंग करणे.

६. स्वच्छ भारत मिशनच्या सर्व धारिका मंजूरीसाठी उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता) यांचेकडून मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेकडे जातील.

७. तांत्रिक मान्यता आवश्यक असलेल्या सर्व धारिका कार्यकारी अभियंता यांचेकडून उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता) यांचेमार्फत मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेकडे जातील.

८. स्वच्छ भारत मिशन व संत गाडगेबाबा ग्रामस्वच्छता अभियानाचे लेखापरिक्षण व शक पुर्तता करणे.

९. उपरोक्त कामांव्यतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद आणि शासनामार्फत दिलेली सर्व कामे पार पाडणे.

**(१) (ब) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद यांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या**

१. स्वच्छ भारत मिशनमधील तांत्रिक बाबी उदाहरणार्थ सार्वजनिक शौचालय, घनकचरा व सांडपाणी व्यवस्थापन व इतर कामांचे क्षेत्र सर्वेक्षण करुन त्यांचे अंदाजपत्रक तयार करणे, त्या अंदाजपत्रकास तांत्रिक मंजूरी देणे.

२. स्वच्छ भारत मिशनमधील सर्व कामांचे लाईन ले-आऊट तयार करणे.

३. स्वच्छ भारत मिशनमधील सर्व कामांच्या गुणवत्तेचे पर्यवेक्षण करणे.

४. स्वच्छ भारत मिशनमधील सर्व कामांची मोजमापे घेवून मुल्यांकन (MB) करुन अंतिम बील तयार करणे.

५. घनकचरा व सांडपाणी व्यवस्थापन आणि सार्वजनिक शौचालयाची कामे पूर्ण झाल्यानंतर आर. ए. बील तयार करुन गट विकास अधिकारी यांच्याकडे मंजूरीसाठी सादर करण्याकरीता उप अभियंता यांना सहकार्य करणे.

६. शासन, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अथवा उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता) यांनी सोपविलेली सर्व कामे पार पाडणे.

## (२) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम व जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२

### (२) (अ) उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता), जिल्हा परिषद यांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या

१. पाणी पुरवठा योजनांची प्रसिध्दी, प्रचार, जनजागृती, विविध टप्प्यांवरील प्रशिक्षणे आयोजित करणे, पाणी पुरवठा योजनांची अंमलबजावणी करणे.

२. पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीची जबाबदारी उपमुख्य कार्यकारी अधिकारी, पाणी व स्वच्छता यांची राहिल. पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीसाठी प्रचार, प्रसिध्दी व क्षमता बांधणी याचे संनियंत्रण करणे.

३. ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीसाठी उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता) हे तांत्रिक बाबींकरीता कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद यांचे सहकार्य घेतील.

४. राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम व जलस्वराज्य टप्पा-२ मधील योजनांचा प्रकल्प अंमलबजावणी आराखडा व वार्षिक अंमलबजावणी आराखडा कार्यकारी अभियंता यांच्या सहकार्याने तयार करण्याची जबाबदारी उप मुख्य कार्यकारी अधिकारी, पाणी व स्वच्छता यांची राहिल. राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाचा प्रकल्प अंमजलबजावणी आराखडा व वार्षिक अंमलबजावणी आराखडा कार्यकारी अभियंता हे उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता) यांच्यामार्फत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना सादर करतील.

५. पाणी पुरवठा योजनांबाबत येणाऱ्या सर्व प्रकारच्या तक्रारींची चौकशी करणे व त्यावर उचित कार्यवाही करणे. तक्रारींमधील तांत्रिक बाबींसाठी उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता) हे कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद यांचे सहकार्य घेतील.

६. राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाशी व जलस्वराज्य टप्पा-२ कार्यक्रमाशी संबंधीत सर्व शासकीय पत्रांवर व विधीमंडळाशी संबंधित कामकाजावर कार्यवाही करण्याची जबाबदारी उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता) यांची राहील. यासाठी कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग यांचे आवश्यकतेप्रमाणे सहकार्य उप

मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता) घेतील. **शासनाकडून प्राप्त झालेल्या सर्व पत्रांवर मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या स्वाक्षरीनेच अभिप्राय पाठविणे/उत्तर देणे बंधनकारक आहे.**

७. ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या प्रशासकीय मंजूरीचे सर्व प्रस्ताव उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता) यांच्यामार्फत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना सादर केले जातील.

८. राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम, जलस्वराज्य टप्पा-२ कार्यक्रम व इतर पाणी पुरवठ्याच्या कार्यक्रमांतर्गत योजनेतील गाव निवड करण्याची जबाबदारी उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता) यांची राहील. ते आवश्यकतेप्रमाणे कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग यांचे सहकार्य घेतील.

९. राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम व जलस्वराज्य टप्पा-२ कार्यक्रमातील सर्व प्रशासकीय व आर्थिक बाबींचे संनियंत्रण करणे.

१०. सर्व प्रकारच्या पाणी पुरवठा योजनांचे लेखा परिक्षण करुन घेणे, लेखा विषयक आक्षेपांवर कार्यवाही करणे, लेखा अधिकारी यांचेमार्फत शकपुर्तता करणे, याची सर्वस्वी जबाबदारी उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता) यांची राहील. यातील तांत्रिक बाबींसाठी कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद यांचे आवश्यकतेप्रमाणे सहकार्य उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता) हे घेतील.

११. राष्ट्रीय ग्रामीण पेजयल कार्यक्रम व जलस्वराज्य टप्पा -२ कार्यक्रमातील सर्व कंत्राटी कर्मचाऱ्यांचे संनियंत्रण करणे व प्रशासकीय बाबी तपासणे.

१२. पाणी पुरवठ्याशी संबंधीत सर्व माहिती अधिकार अर्जांवर कार्यवाही करणे.

१३. पाणी पुरवठा योजनांशी संबंधीत सर्व न्यायालयीन प्रकरणे हाताळणे.

१४. उपरोक्त कामांव्यतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद आणि शासनामार्फत दिलेली सर्व कामे पार पाडणे.

**(२) (ब) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद यांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या**

१. राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम व जलस्वराज्य टप्पा-२ या कार्यक्रमांतर्गत प्रकल्प अंमलबजावणी आराखडा व वार्षिक अंमलबजावणी आराखडा तयार करण्यास उपमुख्य कार्यकारी अधिकारी, पाणी व स्वच्छता यांना सहकार्य करणे.

२. पाणी पुरवठा योजनांचे क्षेत्र सर्वेक्षण करणे, योजनांचे अंदाजपत्रक तयार करणे व त्यास तांत्रिक मंजूरी देणे.

३. कृती आराखड्यासाठी तांत्रिक माहितीचे संकलन करणे.

४. उपमुख्य कार्यकारी अधिकारी, पाणी व स्वच्छता यांना तांत्रिक बाबींमध्ये सर्वतोपरी सहकार्य करणे.

५. पाणी पुरवठा योजनांची निविदा प्रक्रिया राबविणे.

६. सर्व पाणी पुरवठा योजनांचे लाईन लेआऊट तयार करणे, योजनांमधील कामांची गुणवत्ता तपासणी, कामांचे पर्यवेक्षण करणे, योजनांची कामे विहित कालमर्यादेत पूर्ण होण्यासाठी सहकार्य करणे, झालेल्या कामांचे मोजमाप करुन मुल्यांकन करणे (MB Recording).

७. पाणी पुरवठा योजनांकरीता विविध टप्प्यांवर द्यावयाची देयके, मुल्यांकन दाखले तसेच आर.ए. बील तयार करुन उपमुख्य कार्यकारी अधिकारी, पाणी व स्वच्छता यांचेमार्फत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यांना सादर करणे.

८. पाणी पुरवठा योजनांविषयी प्राप्त तक्रारींमध्ये उपमुख्य कार्यकारी अधिकारी, पाणी व स्वच्छता यांना तांत्रिक सहाय करणे.

९. ग्रामीण पाणी पुरवठा योजनांशी संबंधीत सर्व तांत्रिक बाबींचे संनियंत्रण करणे.

१०. ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीसाठी उपमुख्य कार्यकारी अधिकारी, पाणी व स्वच्छता यांना सहकार्य करणे.

११. जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षास सहकार्य करणे.

१२. शासन, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अथवा उपमुख्य कार्यकारी अधिकारी, पाणी व स्वच्छता यांनी सोपविलेली सर्व कामे पार पाडणे.

## (३) कार्यालय अधिक्षक, जलस्वराज्य टप्पा-२ यांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या

१. कार्यालयीन अधिक्षक हे पद ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छतेच्या सर्व कार्यक्रमांसाठी कार्यरत राहिल.

२. राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम, स्वच्छ भारत मिशन व जलवराज्य टप्पा-२ मधील जिल्हा स्तरावरील सर्व कंत्राटी कर्मचाऱ्यांची भरती प्रक्रिया, त्यांच्या प्रशासकीय बाबी, त्यांची पुनर्नियुक्ती या सर्व बाबी उपमुख्य कार्यकारी अधिकारी, पाणी व स्वच्छता यांच्या संनियंत्रणाखाली पार पाडणे.

३. पाणी पुरवठ्याशी व स्वच्छतेशी संबंधीत सर्व योजनांचे रिपोर्टिंग व माहिती संकलित करणे.

४. माहिती अधिकाराविषयक बाबी हाताळणे.

५. कार्यालयाशी संबंधीत बैठकांचे नियोजन करणे, कार्यालयीन सुव्यवस्था राखणे, कार्यालयीन रजिस्टर व धारिका अद्ययावत व सुस्थितीत ठेवणे.

६. कार्यालयाशी संबंधीत सर्व आस्थापना विषयक बाबी पाहणे, सर्व पत्रव्यवहार करणे.

७. सर्व कंत्राटी कर्मचाऱ्यांच्या आस्थापनाविषयक नोंदी ठेवणे.

८. उपमुख्य कार्यकारी अधिकारी, पाणी व स्वच्छता व कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद यांना सहकार्य करणे.

९. जिल्हा स्तरावर आयोजित होणाऱ्या बैठकांसाठी समन्वयक म्हणून काम पाहणे.

१०. डी.डब्ल्यु. एस. एम., टी.एस.सी., जलस्वराज्य -२ मधील कर्मचाऱ्यांच्या कामकाजावर नियंत्रण ठेवणे तसेच त्यांच्याकडून जॉबचार्ट प्रमाणे काम करुन घेणे.

११. जिल्हा स्तरावरुन सभांची माहिती संकलित करणे, संभांची इतिवृत्त तयार करणे.

१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, उपमुख्य कार्यकारी अधिकारी, पाणी व स्वच्छता व कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद यांनी वेळोवेळी सोपविलेल्या जबाबदाऱ्या व सुचनांनुसार कार्यवाही करणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201503021429117928 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAVRIKAR AJAY KISHANRAO

Digitally signed by SAVRIKAR AJAY KISHANRAO
DN: CN = SAVRIKAR AJAY KISHANRAO, C = IN, S = Maharashtra, O = WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, OU = WATER SUPPLY AND SANITATION,CID - 917821
Date: 2015.03.02 14:48:48 +05'30'

**(अजय सावरीकर)**

उपसचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

२. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा.मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व सन्माननीय विधिमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई.
६. मा.मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई.
७. सर्व अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालयीन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
९. विभागीय आयुक्त (सर्व)
१०.संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
११.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१२.उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता), जिल्हा परिषद (सर्व)
१३.संचालक, समाज कल्याण संचालनालय, पुणे.
१४.संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था, बेलापूर, नवी मुंबई.
१५.महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
१६.महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
१७.मुख्य अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
१८.अधीक्षक अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
१९.कार्यकारी अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
२०.कार्यकारी अभियंता (सर्व), ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
२१.मंत्रालयीन इतर सर्व विभाग व त्यांच्या अधिनस्त असलेली सर्व कार्यालये.
२२.पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने.
२३.निवडनस्ती, कार्यासन पापु-०७.